# बर्की : एक थरथराट (ट्रेकवर्णन)


लेखक : निलेश पाटील

7875793032

nileshpatil2610@gmail.com




छायाचित्रे : निलेश पाटील

मुखपृष्ठ व शेवटच्या पानावरील काही छायाचित्रे गुगलवरून घेतली आहेत


प्रकाशन : ई साहित्य प्रतिष्ठान

www.esahity.com

esahity@gmail.com

9869674820

प्रकाशन : २१ ऑगस्ट २०१६

बर्की एक थरथराट...........□



गोष्ट त्यावेळची......... कॉलेज कॅम्पसमध्ये असताना मी व माझे मित्र तोफ्या पदया इंद्रया आणी संत्या असे पाचजण जेवण करीत बसलो होतो. पावसाळा चालू होता. नुकतीच गणेशचतुर्थी होऊन गेली होती. हिरव्यागार निसर्गानं बाळसं धरलं होतं. त्या धुंद वातावरणात लेक्चर चुकवून निवांत गप्पा मारत जेवण चालू होतं......

मला आठवतयं सप्टेंबर २०११ चं वर्ष ते हयावेळी गौरी गणपतीच्या वेळीसुदधा पावसाची उघडझाप चालु होती. वातावरण कुंद होतं काहीक्षण गेले आणी अचानक जेवता जेवता मनात विचार आला की काहीही करून या वेळी धबधबा बघायला जायचंच. पण पुढं मात्र एक संकट होतं. सप्टेंबरचा लास्ट आठवडा चालु होता. ऑक्टोंबरच्या पहिल्याच आठवडयात सेशनल एक्झाम होती. त्यामुळे काही सुचत नव्हतं. मन कधी तळयात तर कधी मळयात होत होतं. तरिही काही नाही म्हटलं धवधबा बघायला जायचंच. मग काय बघता... १५-२० पोरं तयार झालीत. पोरं लय जोशात होती. तरूण रक्तचं तसं असतं गरम सळसळणारं लगेच त्या रात्री गाडी ठरवली. मग ११

जण मोठया गाडीत् आणी बाकीची “टू व्हिलरने” जायचा प्लॅन ठरला. आणी त्या प्लॅनचं मुख्य आकर्षण होतं......

बर्कीचा धबधबा.........

२५ सप्टेंबरला आम्ही सगळी मुलं ठरल्याप्रमाणे एकत्र जमलो. मी तोफ्या पदया निखल्या इंद्रया दया ही टु व्हिलरनं आणी बाकीची ११ जण सुमोनं असं ठरवून वडगाव मधून सकाळी ७.३0ला निघालो. जाताना पोरांचा रूबाब काय विचारता सगळी पोरं विमानात बसून परदेश दौयावर निघाल्यासारखी ऐटीत होती.सगळयांनी जर्कीन् टोप्या गॉगल् बॅगा घेतल्या होत्या. त्यात महत्वाचं म्हणजे संत्याला आगोदरचं फोन करून सांगीतलेलं मटण करूण घ्यायला.

असा हा आमचा प्रवास चालू झाला. वडगांव शिरोली कोल्हापूर फुलेवाडी अशी गावं मागं टाकत ९ वाजता संत्याच्या गावाजवळ म्हणजे साबळेवाडीजवळ आलो तर संत्या नुकताच उठून मटन आणायला गेला होता.



डिमंच आहे कुठला कोणतंच काम वेळेवर करत नाही मी मनाशीच म्हणालो आता मटण तयार व्हायला १0.३0 वाजणार म्हणून बाकीच्या ११ जणांना आम्ही पुढं पाठवलं पावसाची उघडझाप चालूच होती. एकदाचं मटन तयार झालं आणि आम्ही पटापट डवे भरून घेतले. पद्यानं शाकाहारी जेवण घेतलं आणि एकदाश्या आमच्या गाडया सुटल्या. आधे मध्ये पाऊस चालूच होता. रस्त्यावरून पाणी वाहत होतं.

पाऊस कमी होईल असं वाटलं होतं पण जस जसं धबधब्याकडे जाईल तसा पाऊस वाढत चालला होता आम्ही भिजून गार झालो होतो. कळे ओलांडून आम्ही बर्कीचा रस्ता

धरला सुमोतील सगळी १०.३० लाच पोहचली होती. आम्ही पाठोपाठ ११.३० वाजता पोहोचलो. एकदाचं बर्कीत येऊन पोहोचलो.

बर्की......



आठ ते दहा घराचंच गांव कुठल्याही सुखसुविधा नसणारं. पावसात चिंब भिजून निघालेली कौलारू घरं हिरवीगार पसरलेली भात शेती. शिरावरती इरलं घेऊन शेताकडं निघालेली बायका माणसं. थंडीत लहान मुलांच्या बरोबर गारठलेली शाळा आणि शुभ्र धुक्यात न्हालेलं बर्की गाव. मनाला एकदम मस्त वाटलं. गावात जाण्यासाठी दोन पुल होते. एक नदीवरचा आणि एक ओढयावरचा नदीच्या पुलावर घोटयाएवढं पाणी तांबडं भडक मातकट रंगांच ते पाणी बघत आम्ही गावात आलो मग काय निवडून आल्यावर नेतेमंडळी रूबाब मारतात तसा आमच्या प्रत्येक पोरांचा रूबाब वाढला.एके ठिकाणी गाडया पार्क केल्या आणि चालत निघालो गावापासून धवधबा ७ ते ८ किलो मीटरवर होता. जाता जाता पोरीच्या नकला काढणंही चालू झालं होतं. पावसाचा जोर वाढला होता. रपारप तोंडावर पावसाचे फटकारे बसायचे. सभोवताली पसरलेल्या हिरव्यागार निसर्गाकडं पाहत आम्ही सर्वजण पुढे पुढे चाललो होतो. धवधब्याचा ओढीन नाहीतर माणसाला कुठल्या न कुठल्या गोष्टीची ओढ ही हवीच.

आम्ही धबधब्याजवळ येऊन पोहोचलो आणि पाहतो तर काय□४० ते ५० फुटावरून आपल्या सहस्त्रावधी पांढ□या शुभ्र जलधारा घेऊन धबधबा कोसळत होता.त्याच्या कोसळणा□या आवाजानं दरीतून तालबध्दं आवाज येत होता. निसर्गानं जणू सतार छेडली आहे की काय असं वाटाय लागलं. उंचावरून पडून फेसाळत जाणारं पाणी सभोवताली पसरलेल्या अगणीत रानवेली त्यांच्यावरील रंगांची उधळण करत असलेली

हजारो इवली इवली फुलं मी क्षणभर डोळे मिटले तो नयनरम्य सोहळा मनात साठवून घेऊ लागलो. नाहीतर या जगात असे क्षण दुर्मिळच.

एवढया उंचावरून पडणारं पाणी बघून सर्वांचे डोळे दिपून गेले. निम्मी पोरं धबधब्याजवळ जायला घाबराय लागली मग मनाचा हिय्या करून म्हटलं धबधब्याच्या पाण्यात जाऊन उभं राहायचंच. मग तोफ्याानं धैर्य दाखवल्यावर दुसरी गप बसतात व्हयं सगळी पोरं तयार झालीत पहीलवान कुस्ती खेळायला आखाडयात उतरतात तशी.

आमच्यातला आमत्या पाण्याला जरा भ्यायचा हडकुळं शरीर त्याचं आणि पाण्यावर तरंगल अशी देहयष्टी पण सगळयांनी प्रेरणा दिल्यावर तेही पाण्यात उतरलं मग काय दंगा नुसता दंगाच. उंचावरून पाणी अंगावर रपारप पडत होतं सगळी गारठली होती. कोण कोणाच्या अंगावर पाणी उडवतोय. कोण धबधब्याखाली उभा राहतोय. कोण पाण्यातला गाळ काढून दाखवतोय अशी नुस्ती मस्ती चालली होती. आपल्या आयुष्यातले चांगले क्षण वेचण्याची क्षमता हवी.

सकाळी नुसता नाष्टा केलेली पोरं दोन वाजेपर्यंत पाण्यातचं होती. सर्वांना भुक लागली होती. पाण्याबाहेर येऊन अंग पुसून सगळी जेवणावर तुटून पडलीत. चारजण शाकाहारी बाकीची सगळी मांसाहारी लागली जेवणावर ताव मारायला.



आज्या कडाकणे म्हणजे वसवश्या नुसता. बर्कीत एंट्री मारल्यापासून डब्यातली एक एक फोड खायला चालू केलेली त्यानं. तेच काम सगळं वसवश्यासारखं मटणावर तुटून पडलं आज्या. सगळी आरामात एकमेकांची चेष्टा करत खायला लागली. पोटाची आग विझवण्याचं काम झालं होतं. आता

काय जरा फोटो बिटो काढूया इंद्रया म्हणाला त्याचा निर्णय सगळयांनी उचलून धरला. मग दांडगा रूबाब हयांचा. गॉगल जर्कीन घालून एखादया नव्या नवरानवरीगत सगळयांनी फोटो काढून घेतले. दुपारचे ३.३0 झाले होते धबधब्याची हौस फिटली होती. सगळीच दमलेली आता म्हटलं परतीचा प्रवास धरला पाहीजे.

पण जसा जसा परतीचा प्रवास धरला तसा पावसाचा जोर वाढत चालला. पावसात भिजून पोरं वल्लीचिप झाली होती. आम्ही बर्की गावचा रस्ता धरला होता. निसर्गानं नटलेल्या हिरव्यागार डोंगरटेकडयांवरून आम्ही खाली उतरू लागलो. त्यातच कुणी घसरून पडला कुणाची चप्पल तुटली कुणाच्या पॅण्टा फाटल्या पावसाचं झोडपणं सोसत आम्ही बर्की गावात पोहोचलो.

चला आता गाडया हलवून परतीच्या प्रवासाला लागलं पाहीजे असं म्हणून आम्ही गाडया हलवल्या परतीच्या प्रवासाला लागलो. गावाबाहेर जाताना ओढयाच्या पुलावरून अर्धाफुट पाणी वाहत होतं. आम्ही तो पुल ओलांडून नदीच्या पुलावर येऊन पोहोचलो आणि बघतोय तर काय त्या पुलावरून ३.५ ते ४ फुट पाणी वाहत होतं. बघेल तिकडे पाणी चहा उकळयागत वाहताना दिसत होतं. त्यामुळे पाण्याची पातळी कमी व्हायला कमीत कमी १२ ते १५ तास लागतील असा तिथल्या लोकांचा अंदाज त्यामुळे सगळी पोरं भिऊन गार झाली. "च्या आईला आज काय आपण इथनं निघत न्हाई" असं सगळी जण म्हणाय लागली. ५.३0 पर्यत वाट बघीतली पण कुठलं काय एक इंचही पाणी कमी होई ना त्यात पावसाचा जोर आणखीनच वाढला तशी पाण्याची पातळी आणखी वाढू लागली. आज काय आपण इथनं निघत नाही पोरं कुरकुरायला लागली.

नदीच्या पलीकडल्या तिरावर ही बर्की बघायला आलेली मुलं उभी होती. आम्ही इकडे तर ती तिकडे असे दोघेही अडकले होते. पलीकडच्या तिरावर उभ्या असणा�या चार बहादूरांनी पुलावर जाण्याचा प्रयत्न केला एकमेकांच्या हात धरून ती पाण्यात उतरली आणि इथूनच एका थरारक नाटयाला सुरूवात झाली.

सगळयांच्या नजरा त्यांच्यावर खिळलेल्या सर्वात पुढे असणा□या माणसाच्या हातात बियरची बाटली नशेत असणारं शरीर. अडखळणारी पावलं या सर्वांकडे बघून प्रत्येकाच्या मनात धडधड वाढायला लागली. प्रत्येकांचे डोळे विस्फारले गेले. प्रत्येक बघ्यांचे हृदयाचे ठोके त्याचं त्यांनाच जाणवायला लागले हे कसलं वेडं धाडस म्हणायचं की अंगमस्ती आमची उत्सुकता ताणली गेली होती. मनातल्या मनांत आम्ही परमेश्वराचा धावा केला. जणू ते चौघे आमचेच नातलग असल्यासारखी काळजी वाटाय लागली. पाणी वाहत होतं. आपल्याच मस्तीत बघता बघता चौघे मध्यावर आले आणि हळूहळू पुढे चालत राहिले. सगळयात पुढच्यानं बाटली पाण्यात टाकुन दिली. बिचारी बाटली सासरहून टाकलेल्या सुनेसारखाी वाहत जाऊन त्या पाण्यात गडप झाली.

पुन्हा हृदयात धडधड

आणि अचानक सगळयांची बोबडीच वळली. त्यातल्या एकाचा हात निसटला होता आणि ते चौघे वाहत जात होते. आम्ही नुस्त बघत राहीलो आणि आमच्या तोंडातून आई शप्पथ......आई शप्पथ शब्द निघत राहीले. जमलेल्या गावक□यांनी व पदयाच्या मदतीने एकाला वाचवलं बाहेर काढलं व बाकीची दोघे पुढे जाऊन अडकली ती पण वाचली पण एकाला वाचवण्यात अपयश आलं. ५ ते १० मिनिटे आम्ही सुन्न उभे होतो. आमचं विचारचक्र या चौथ्या बुडालेल्या इसमाभोवती फिरायला लागलं......कुठं गेला असेल वाहुन तो□कुठे सापडेल□तो गेलाय हे कळल्यावर त्याच्या घरातले नातेवाईक किती आणि कसा आक्रोश करतील□मरतांना त्या इसमाला काय वाटलं असेल□प्रत्येकाच्या मनात एकच विचार तो सुखरूप सापडावा. पण निसर्ग माणसाच्या उध्दट पणाला कधीच साथ देत नाही. पाण्याचा दाब खूप असूनसुध्दा त्यांनी उध्दटपणा केला होता आणि निसर्गाच्या नियमात चुकीला माफी कधीच नसते. झाडावर बसलेल्या चार पांखरांच्या मधलं एक पाखरू उडून गेलं होतं. कधीच न परतण्यासाठी अनंताच्या प्रवासाकडं वाटचाल झाली होती त्याची. असो तो परत फिरणार नाही हे मनाला समजल होतं.

असं बराच काळ उभारल्यानंतर आम्हाला कळलं की बर्की गावातून डोंगरातून टु व्हीलर जाण्याचा मार्ग एका बंधा□यावरून आहे. जिवात जिव आला आमच्या. मग सगळयांचा प्लॅन ठरला. सुमोतली पोरं चालत आणि बाकीची टू व्हीलरनं मेन रोडपर्यंत जायचं सुमो गावातच लावून ठेवायची आणि तिथून एसटीने हलायचंच ६ वाजून गेले होते. सुर्य मावळतीला झुकला होता घटट् काळोख पडायला लागला होता. त्यात पावसाची रिपरिप चालू होती.

आमच्यात संत्या□आज्या□बाबासाहेब□नवन्या□कडाकने□सच्च्या□विशल्या□पकया ही भिऊन गार झाली होती. हे त्यांच्या चेह□यावरच्या हावभावावरून समजत होतं. कोण काहीच बोलायला तयार नाही. आमच्यात एक शांततेच वातावरण तयार झालेलं. एकमेकांच्या तोंडाकडं आम्ही बघत होतो आणि आपण उगाच आलो इकडे असं मनातल्या मनात म्हणत होतो. अंधार पडायला लागला होता आणि इथून जायचंच हे सा□यांच्या मनात पक्क ठरलेलं चालत जाणारी पुढं जात होती सोबतीला गावातलं पोरगं रस्ता दाखवायला आलं होतं.ते बेणं मधीच आम्हाला टाकुन पळालं रात्र झाली होती आणि हे बेणं पळालय म्हटल्याबर आमच्या तर तोंडचचं पाणी पळालेलं. नवा प्रदेश नवीन वातावरण त्यामुळे मनात भितीची एक लाट उसळू लागली. कारण इथं आल्यापासून आम्हावर संकटावर संकट येऊ लागली होती.

पायवाटेने गाडया घातल्या होत्या त्या चिखलाने जाम भरल्या होत्या. पंख्यात चिखल अडकला होता बाकीच्यांना पुढं जायला सांगून आम्ही पाचजण मागे राहीलो होतो. आणि आगीतून उठून फुफाटयात पडलो होतो. आम्ही चिखल काढू लागलो. मधेच दया फोनला रेंज इत्याय का ते उंची टेकडीवर जाऊन बघायचं.

सभोवताली झाडी घटट् काळोख सु सु करत वाहणारं वारं पावसाची संततधार रानकिडयांचा किर्र किर्र आवाज जणू काय निसर्ग आमची फजीती उडवायला बसलेला

आम्ही तर पूर्ण संपलोच होतो. बुडत्याला काडीचा आधार असतो तसं आम्ही एकमेंकाना सावरून मार्ग काढत होतो आणि निसर्ग आमच्यावर हसत होता.

गाडया चिखलातून मोकळया करून आम्ही आणखी पुढे आलो लांब अंतरावर आम्हाला पोरं दिसली जरा हायसं वाटलं. आमच्या गाडया झपझप त्याच्या दिशेन कुच करू लागल्या तिथं जाऊन बघतोय तर ती माणसं त्याच गावातली होती. पुन्हा निराशेचे धारधार पातं काळजाला स्पर्शून गेलं. आम्ही पुढे चाललो एके ठिकाणी पुल लागला आणि सगळयांच्या चेहऱ्यावर आनंद दिसला. आता हा पुल ओलांडला की आपण मेनरोडला येणार या कल्पनेनंच मनाला हायसं वाटलं. आम्ही धावतच होतो गाडीसकट आणि पाहतो तर काय आम्ही पुन्हा त्याच गावात ओढयाच्या दुसऱ्या पुलाजवळ. आईच्या गावात रे आपसूकच तोंडातून निघून गेलं. आमची तर बोलतीच बंद खडाखड स्वतःलाच मुस्काटात मारून घ्याव्यात आणि परत बर्कीला येशील काय म्हणावं इतका वैताग आला होता. निसर्गान आणि त्या आभाळातल्या देवानंही किती परीक्षा बघीतली होती आमची.

आता आमच्यावर मोठं सकंट येणार याची आम्हाला कल्पना आली आणि आम्ही अंगभर शहारलो. आता बाकीच्या पोरांना कुठं हुडकायचं हा प्रश्न पडला तिथल्या लोकांना विचारलं तर त्यांनी सांगितलं की अर्ध्या तासापूर्वी आठ दहा पोरं याच पुलावर आली होती. त्यांच्या अस्तित्वाचा कल्पनेनं आमचा जीव भांडयात पडला. धपापल्या उरानं आम्ही गावाच्या दिशेनं पळत सुटलो. जणू आमच्या पाठीमागं वाघच लागला होता. पळता पळता दिवसभर घडलेल्या घटनाही आमच्या मनात धावत राहील्या. आनंद दुःख भीती टेन्शन आणि आपल्या मित्रांचा विरह हे सारं घुमाय लागलं होतं डोक्यात.

गावात आलो तर हि सारी मंडळी एका आजीच्या घरात होती. हनुमानाला द्रोणागिरी मिळाल्यावर जितका आनंद झाला नसेल इतका आनंद आमच्या साऱ्यांना झाला पळत पळत जाऊन आम्ही एकमेकाला मिठी मारल्या. त्यात आनंद दुःख विरह मित्रप्रेम या साऱ्या भावना होत्या. जन्म जन्मांतरीच्या विभक्त झालेल्या माणसाला आपल्या आवडत्या

व्यक्ती भेटल्यावर जसा आनंद होतो तसा आनंद ही होत होता. आयुष्यात मित्रांची भुमिका काय असते हे त्यावेळी जाणवलं मित्र आयुष्यातील स्वर्ग असतो याची जाणीव झाली.

आमच्या समोर असणाऱ्या त्या आजीलाही गहीवरून आलं आम्ही स्वतःला सावरलं. तोपर्यंत आजीनं या साऱ्यांचं जेवण केलं होतं. जेवण करता करता आम्ही बोलू लागलो सा-या घटनेविषयी...

जेवण उरकल्यावर थोडी लोकं आजीच्या घरात झोपली आणि थोडी गाडीत जाऊन झोपली. मी अंगावर पांघरून घेऊन जमिनीला पाठ टेकली अन आठवू लागलो ते सारे क्षण साऱ्या घटना बाहेर पाऊस कोसळत होता जणू त्याला काय सोयर सुतकचं नाही आमचं पावसाबरोबर सारे क्षण आठवाय लागले. तोंडावर कांबरून घेऊन मी साऱ्या दिवसभरच्या घटनांत वाहून गेलो. खरचं आज आजी भेटली नसती तर आम्ही कुठं रहायचं होतं आणि काय खायचं होतं नवा प्रदेश नवी माणसं नव्या चालीरिती या साऱ्यात आम्ही कुठे बसलो असतो. आजीनं केलेली तांदळाची भाकरी चटणी भात आमटी जिभेवर रेंगाळाय लागली. ती चवच न्यारी गावाकडची तिथल्या माणसांच्या गोडव्यातली मनातल्या मनात त्या आजीला मी लाख सलाम दिले. परमेश्वर आजीच्याच रूपानं आम्हाला मिळाला होता. हे मात्र खरं बाहेर जोरात पाऊस कोसळत होता आणि मलाही मनातल्या मनात आत भिजवत होता.

मी झोपी जायला लागलो उदयाच्या नव्या पहाटेच्या प्रतिक्षेत नवा दिवस अनुभवण्यासाठी नव्या घटना अनुभवण्यासाठी. ती सुंदर सकाळ पक्ष्यांच्या किलबिलाटानं मला जागं करणारी. मी उठलो सारी आन्हीक उरकून चहा घेतला सारेजण तयार झाले आता आजीला निरोप देण्याची वेळ झाली होती. खिशातले आठशे नऊशे रूपये काढून आम्ही त्यांना दिले त्या एवढे नको म्हणत होत्या पण आम्हाला आसरा देणारी जेवण देणारी ती माऊली आम्हाला देवच वाटत होती सारं आटपून आम्ही तिचा निरोप घेतला एव्हाना

पावसाचा जोर कमी झाल्यानं पुलावरलं पाणी उतरलं होतं. आम्ही गाडया काढल्या पुन्हा संसारच्या या सागरात नवे अनुभव नवा वेदना घेण्यासाठी आम्ही सज्ज झालो. आणि गाडया धावाय लागल्या. बर्की गावातून आम्ही आमचं अस्तीत्व काढून घेत होतो. ज्या बर्कीनं आम्हाला २४ तासात जगण्याचे धडे दिले होते. चांगल्या वाईट अश्या संमिश्र भावनांचे गाठोडे दिले होते. ती शिदोरी आता आम्ही आयुष्यभर पुरवून खाणार होतो. गाडया भरधाव धावाय लागल्या आणि निसर्ग मागे पडत होता. एक एक आठवणी आठवून आम्ही नुसतेच गप्प जात होतो. बर्कीला आठवत मनात साठवत......

आता हे सगळे लिहुन काढताना बाहेर आभाळ भरून आलयं...तसं माझ्या डोळयातलं आभाळही भरून आलयं आठवणींची एक संवेदना माझ्या मनाला स्वर्शून गेली. मित्रांच्या सानिध्यातले दिवस आठवले. डोळे मिटून मी बर्कीला आठवले आणि पुन्हा भुतकाळातील......आठवणी बनून

लेखन ः निलेश बाळासो पाटील

अशोकराव माने कॉलेज ऑफ फार्मसी पेठ वडगाव.



# ई साहित्य प्रतिष्ठान

ई साहित्य प्रतिष्ठान मराठी साक्षरांमध्ये वाचनाची आवड निर्माण व्हावी आणि लेखक व कवींना एक सशक्त व्यासपीठ मिळावे या दुहेरी हेतूने स्थापन झाले. मराठीत एक जबरदस्त वाचन संस्कृती निर्माण व्हावी, तरुणांनी भरपूर वाचन करावे, ग्रामीण भागातील तरुणांना मोबाईलवर पुस्तके उपलब्ध व्हावीत, परदेशस्थ मराठी वाचकांना सहजासहजी इंटरनेटवर पुस्तके मिळावीत हे आमचे स्वप्न. जगातील चाळीस देशांतील सुमारे साडेतीन लाख वाचक या चळवळीचे सभासद आहेत . त्याशिवाय वर्षाला सुमारे तीस ते चाळीसलाख वाचकवेबसाईटवरून पुस्तके डाऊनलोड करतात .

अर्थात याने आमचं समाधान नाहीसुमारे बाराकोटी मराठी माण्सांपैकी किमान अर्धे . .माउलिंनी सांगितलंय .व्हावेत अशी आमची इच्छा आहे "वाचक" म्हणजे सहा कोटी लोक"जो जे वांछिल ते तो लाहो". आमचीही वांछा .पूर्ण करील "तो"करीलच.

आमच्या वाचकांना एकच विनंती. आपल्या ओळखीच्या किमान दहा साक्षरांचे ई मेल पत्ते आम्हाला पाठवा. अशा रितीने आपण तीनाचे तीस आणि तिसाचे तिनशे होऊ. या मराठीचिये नगरी ब्रह्मविद्येचा सुकाळू व्हायला वेळ नाही लागणार. सर्वांची साथ असेल तर.

एवढी विनंती मान्य कराच.

ई मेल पत्ते esahity@gmail.com या पत्त्यावर पाठवा बरं!